क्रीडा विद्यापीठ व क्रीडा अकादमी -
**क्रीडा महर्षी प्रा. दि.ब. देवधर प्रबोधीनीच्या शाळेतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे वेतन अदा करण्याकरीता निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः क्रीडायो-२३२०/प्र.क्र. ७९/क्रीयुसे-१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २६ मे, २०२०.

वाचा :-

१. शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्रमांक- शाशिम-१०९५/ प्र.क्र.१६६/ क्रीयुसे-३, दिनांक १८ नोव्हेंबर, १९९५.
२. शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्रमांक- शाशिम-१०९६/प्र.क्र. ६१/ क्रीयुसे-१, दिनांक २७ मार्च, १९९७.
३. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि. १६ एप्रिल, २०२०.
४. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्र: निविप्र/०१/२०२०-२१/(१)/का-११/१५७८, दिनांक २० एप्रिल, २०२०.
५. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि. ४ मे, २०२०.

प्रस्तावना :-

राज्यात शारिरीक शिक्षण व क्रीडा यांचा दर्जा उंचविण्यासाठी, क्रीडा विद्यापीठ स्थापन करण्याचा पहिला टप्पा म्हणून पुणे येथील शिवछत्रपती क्रीडानगरी येथे मध्यवर्ती क्रीडा केंद्र व राज्यातील वेगवेगळया १४ ठिकाणी क्रीडा प्रबोधिनी स्थापन करण्यास संदर्भाधिन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आली आहे. तसेच श्री. शिवछत्रपती क्रीडा विद्यापीठाच्या पुणे येथील क्रीडा महर्षी प्रा. दि.ब. देवधर प्रबोधीनीसाठी १०० टक्के अनुदान तत्वावर शाळा सुरु करण्यास संदर्भाधीन क्र. २ च्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आली आहे.

सदर प्रबोधीनीसाठी तथा अनुदानित शाळेतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे माहे जानेवारी, २०२० पासूनचे वेतन अदा करण्यासाठी तरतूद वितरीत करण्याची मागणी संदर्भाधीत क्र. ४ येथील पत्रान्वये केली आहे. त्याअनुषंगाने तरतूद वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सदर क्रीडा प्रबोधीनीच्या अनुदानीत शाळेतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे वेतन अदा करण्यासाठी "वेतन" लेखाशिर्ष उघडण्याची कार्यवाही सुरु आहे. सद्यस्थितीत या कर्मचाऱ्यांचे वेतन "मागणी क्रमांक ई-३, प्रधान लेखाशीर्ष २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४, क्रीडा व खेळ, (३३) क्रीडा विद्यापीठ व क्रीडा अकादमी, (३३)(०१) क्रीडा विद्यापीठाची स्थापना (कार्यक्रम), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर), (२२०४ २०६४)" या लेखाशीर्षाखाली अदा करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे. तसेच सदर लेखाशिर्षाखाली सन २०२०-२१ मध्ये मंजूर केलेल्या तरतूदीपैकी ५% इतकी तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शाळेतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे माहे जानेवारी, २०२० व फेब्रुवारी, २०२० चे संपूर्ण वेतन तसेच मार्च, २०२० चे वेतन वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक संकीर्ण-२०२०/ प्र.क. ६२/ कोषा प्रशा-५, दि. ३१/३/२०२० व दि. १/४/२०२० मधील आदेशानुसार यथास्थिती ७५% अथवा ५०% इतके याप्रमाणे व माहे एप्रिल, २०२० चे संपूर्ण वेतन या प्रमाणे थकीत वेतन अदा करण्यात यावे. तसेच माहे मे, २०२० चे नियमित वेतन अदा करण्यात यावे.

३. वेतनासंदर्भातील विहीत आदेश/ तरतूदी यांचे पालन करुन वेतन अदा करण्यात यावे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २७५/२०२०/व्यय-५, दिनांक २२/५/२०२० अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००५२६१५५०५३८८२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e1d6f07c5cabf5884958ee70015d36b35b2c07e9700fe62cba2439a81b4be4, cn=Swati Madhukar Nanal
Date: 2020.05.26 15:59:13 +05'30'

**(स्वा.म. नानल)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल , महाराष्ट्र राज्य.
२. मा.मंत्री, क्रीडा व युवक कल्याण यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. मा. राज्यमंत्री, क्रीडा व युवक कल्याण यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
५. सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य यांचे स्वीय सहायक.
५. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
६. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
७. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,
८. महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर
९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई. (क्रीडा संचालनालयामार्फत)
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे (क्रीडा संचालनालयामार्फत)
११. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे. (क्रीडा संचालनालयामार्फत)
१२. सहसंचालक / उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे
१३. जिल्हा क्रीडा अधिकारी, पुणे (क्रीडा संचालनालयामार्फत),
१४. वित्त विभाग (व्यय-५)/(अर्थ-८), मंत्रालय, मुंबई,
१४. कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५. निवड नस्ती (क्रीयुसे-१)